सामाजिक न्यायाचे पुढचे पाऊल
असंघटित कामगारांसाठी प्राधिकरण
स्थापन करणेबाबत.

GR - 20050729152621001-1100

महाराष्ट्र शासन
उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,
शासन निर्णय क्र.प्राधिकरण- २२००४/प्र.क्र.३३५/कामगार-७,
मंत्रालय, मुंबई- ४०००३२.
दिनांक :- ९ जुलै, २००५

**प्रस्तावना :-**

राज्यामध्ये असंघटित क्षेत्रातील कामगारांची संख्या मोठ्या प्रमाणात असून या क्षेत्रातील कामगारांचा दारिद्रय रेषेखालील व्यक्तींकरिता असलेल्या कल्याणकारी योजनांमध्ये समावेश नसल्यामुळे, तसेच इतर समन्वय नसल्यामुळे आणि त्यांच्याबद्दलची वस्तुनिष्ठ सांख्यिकी माहिती नसल्याने, या कामगारांसाठी योजना आखून त्या अमलात आणणे शक्य झालेले नाही. ही वस्तुस्थिती विचारात घेता सामाजिक न्यायाचे पुढचे पाऊल म्हणून असंघटित कामगारांसाठीचे एक स्वतंत्र उच्चाधिकार प्राधिकरण असावे, ही बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

असंघटित कामगारांसाठी विशेषतः, ऊसतोड कामगार, बांधकाम मजूर, वीटभट्टी मजूर, विडी कामगार, हातमाग/यंत्रमाग कामगार, चिंध्या गोळा करणारे कामगार, रिक्षा ओढणारे कामगार, घरकाम कामगार (घरगडी व मोलकरीण) वगैरेसाठी, शासन स्तरावर उच्चाधिकार प्राधिकरणाची स्थापना करण्यात येत आहे. असंघटित क्षेत्रातील कामगारांना टप्प्याटप्प्याने संघटित करुन सामाजिक सुरक्षेच्या मुख्य प्रवाहात आणण्यात येईल. यासाठी राज्यस्तरावर उच्चाधिकार प्राधिकरण स्थापन करण्यात येत असून त्याची रचना खालीलप्रमाणे राहील:-

| | |
|---|---|
| मुख्य सचिव | अध्यक्ष |
| अपर मुख्य सचिव ( सा.बि.स) | सह अध्यक्ष |
| प्रधान सचिव (कामगार) | उपाध्यक्ष |
| सचिव (सहकार) | सदस्य |
| सचिव (सार्वजनिक बांधकाम) | सदस्य |
| सचिव (महसुल) | सदस्य |
| सचिव (सामाजिक कल्याण) | सदस्य |
| सचिव (शालेय शिक्षण) | सदस्य |
| सचिव (महिला व बाल विकास) | सदस्य |
| २ अशासकीय स्वयंसेवी कामगार संस्थेचे प्रतिनिधी | सदस्य |
| २ मालक संघाच्या फेडरेशनचे प्रतिनिधी | सदस्य |
| उप सचिव (कामगार) | सदस्य सचिव |

२. **प्राधिकरणाची उद्दिष्टे खालीलप्रमाणे राहतील:-**

१) असंघटित क्षेत्रातील कामगारांची माहिती गोळा करणे ( Survey ) व या कामगारांची संख्या निश्चित करणे.

२) या कामगारांचे आर्थिक व सामाजिक सर्वेक्षण करणे. (Socio-Economic Survey)

३) या कामगारांसाठी सामाजिक सुरक्षा योजना राबविणे. तसेच केंद्र व राज्य शासनाच्या दुर्बल घटकांसाठी असलेल्या योजनांचा समन्वय साधून त्यांचे लाभ या कामगारांना मिळवून देणे.

४) या कामगारांसाठी व त्यांच्या कुटुंबियांसाठी आरोग्य, निवारा, योजनांसाठी मदत करणे.

५) बाल कामगार प्रथा नष्ट करणे.

६) या कामगारांसाठी किमान वेतन व इतर कामगार कायद्यांचे लाभ मिळवून देणे.

७) कल्याणकारी विमा योजना परिणामकारकरित्या राबवून असंघटित कामगारांना संघटित करणे.

३. वरील उद्दिष्टे साध्य करण्यासाठी प्राधिकरणाचे काम व छोट्या छोट्या योजना परिणामकारकरित्या पार पाडण्यासाठी व योजनांची अंमलबजावणी व्यवस्थित आणण्यासाठी शिस्तबध्द यंत्रणा उभी करण्यात येईल. तसेच या प्राधिकरणाकडे एक स्वतंत्र निधी उभारण्यात येईल. राज्य शासनाने यासाठी सुरुवात म्हणून रुपये पाच कोटी निधी देण्याचे ठरविले असून तो प्राप्त होताच प्राधिकरणासाठी जमा करण्यात येईल.

४. सदर प्राधिकरण राज्य शासन व केंद्र शासनाकडून येणारा निधी जमा करील, सामाजिक व्यक्ती अथवा संस्थांकडून प्राप्त होणारा निधी देखील स्वीकारेल. या निधीसंबंधीचे लेखे अद्ययावत ठेवण्याचे काम विकास आयुक्त (असंघटित कामगार) हे करतील.

५. असंघटित कामगारांसाठी लवकरच विकास आयुक्तालय निर्माण करण्यात येत आहे. तसेच मंत्रालयीन स्तरावर एक स्वतंत्र कक्ष उभा करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(बी.बि.प्रभु)
उप सचिव (कामगार)